**केंद्र शासनाच्या, राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत भाग-२ (गतीशक्ती) अंतर्गत Setting up an Integrated Air Cargo Facility at Shirdi International Airport, Shirdi या प्रकल्पास प्रशासकिय व वित्तीय मान्यता प्रदान तसेच निधी वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र:- बियुडी १६२२/प्र.क्र.३६५/२८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ मार्च, २०२३.

<u>वाचा</u>- १. वित्त विभगाचे पत्र क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१४/अर्थबळ, दि.१७.११.२०२२.
२. DoE, केंद्र शासनाचे दि.२५.११.२०२२ रोजीचे पत्र.
३. वित्त विभागाचे पत्र क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१४-भाग-२/अर्थबळ, दि.२६.१२.२०२२.
४. महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांचे पत्र क्र.म.वि.वि.कं/२०२२/शिर्डी विमानतळ/१२४५, दि.१०.०१.२०२३.
५. सामान्य प्रशासन विभागाचे शासन निर्णय क्र.म.वि.वि-११२२/प्र.क्र.३५३/२८-अ, दि.१९.१२.२०२२.
६. सामान्य प्रशासन विभागाचे शासन निर्णय क्र.बीयुडी-१६२२/प्र.क्र.३६५/२८-अ, दि.१२.०१.२०२३.
७. शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक १६/३/२०२३ च्या बैठकीचे इतिवृत्त क्र.बीयुडी १६२२/प्र.क्र.३६५/२८-अ, दि.२३.०३.२०२३.

**<u>प्रस्तावना:</u>**

केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत राज्यास उपलब्ध होणा-या ५० वर्ष मुदतीचे बिनव्याजी कर्ज सन २०२२-२३ मध्ये एकूण ७ भागांत उपलब्ध होणार आहे. सदर योजनेतील भाग-२ (गतीशक्ती) अंतर्गत उद्योग विभागामार्फत (MIDC द्वारे) जे प्रस्ताव पाठविण्यात आले होते. त्यामध्ये महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीच्या Setting up an Integrated Air Cargo Faciility at Shirdi International Airport, Shirdi या प्रकल्पाचा समावेश आहे. सदर प्रकल्पास केंद्र शासनाचे १००% अर्थ सहाय्य आहे त्यामुळे राज्य शासनावर आर्थिक भार येणार नाही. सदर प्रकल्पास केंद्र शासनाच्या दि.२५.११.२०२२ रोजीचे पत्रान्वये DoE ची मंजूरी प्राप्त झाली असून या प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या रु.५५.००कोटी कर्ज मंजूर केले आहे. वित्त विभागाच्या दि.२६.१२.२०२२ रोजीच्या पत्रान्वये सदर कर्ज दि.३१.३.२०२३ पूर्वी खर्च होणे आवश्यक आहे.

२. सदर योजनेच्या अनुषंगाने दि.१९.१२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीअंतर्गत विमानतळ विकास प्रकल्पासाठी कार्यक्रम लेखाशीर्ष ५०५३ ००९७ हा नव्याने स्वतंत्र लेखाशीर्ष तयार केले आहे.

तसेच वित्त विभागाने दिलेल्या निदेशानुसार सदर योजनेची सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) वर मॅपिंग करण्यात आली असून सदर योजनेच्या अमंलबजावणीसाठी राज्य स्तरावर दि.१२.०१.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये State Scheme Manager(SSM), First Level Agency व Second Level Agency घोषित करण्यात आले आहेत.

३. महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांनी केंद्र शासनाच्या पीएम गतीशक्ती योजनेंतर्गत समावेश असलेल्या Setting up an Integrated Air Cargo Faciility at Shirdi International Airport, Shirdi या प्रकल्पास रु.५५.०० कोटी खर्चास शासन स्तरावर मान्यता देण्याची विनंती केली होती.

४. सदर प्रकल्पास केंद्र शासनाची मान्यता आहे. तरी, राज्य स्तरावर सदर प्रकल्पास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. यानुषंगाने सदर मान्यतेचा प्रस्ताव नियोजन विभागामार्फ़त वित्त विभागास मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास नियोजन विभागाने मान्यता दिली व वित्त विभागाने सदर प्रस्तावास विभागाच्या शक्ती प्रदत्त समितीची मान्यता घेण्याचे निर्देश दिले. त्यानुसार शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक १६/३/२०२३ रोजीच्या बैठकीत प्रस्ताव ठेवण्यात आला त्यास मान्यता प्राप्त झाली. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय-</u>**

केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत भाग-२ (गतीशक्ती) अंतर्गत महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीच्या Setting up an Integrated Air Cargo Faciility at Shirdi International Airport, Shirdi या प्रकल्पाच्या अनुषंगाने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच, यासाठी राज्यास उपलब्ध होणा-या ५० वर्ष मुदतीचे बिनव्याजी **रु.५५.०० कोटी** कर्जातून होणा-या खर्चास खालील नमूद बाबींचा विचार करुन वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. यानुषंगाने कामाचा तपशील व खर्च खालील प्रमाणे आहे.

| Setting up an Integrated Air Cargo Facility at Shirdi International Airport, Shirdi | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **काम** | **खर्च (रु. कोटीमध्ये)** |
| १. | कार्गो टर्मिनल १०,००० चौ.फ़ूट + बाह्य विकास | ८.२५ |
| २. | यंत्रसामग्रीचा खर्च, संबंधित नागरी आणि विद्युत कामे, सोलर पॅनल, क्षेत्र विकास आणि रेन वाटॅर हॉर्वेस्टिंग | ५.७५ |
| ३. | ॲप्रॉन, कनेक्टिंग टॅक्सीवे, पेरिफ़ेरल रस्ता अंतर्गत रस्ता, संरक्षक भिंत बांधकाम | ३०.२५ |
| ४. | जवळच्या महामार्गाशी कनेक्टिव्हिटी(पोहोच रस्ता), ट्रक वाहनतळ व इतर संबंधित कामे | ५.२५ |
| ५. | भूसंपादन | ५.५० |
| | **एकूण** | **५५.००** |

२. केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत भाग-२ (गतीशक्ती) अंतर्गत महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीच्या Setting up an Integrated Air Cargo Facility at Shirdi International Airport, Shirdi या प्रकल्पास सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात नागपूर अधिवेशनात पुरवणी मागणी व्दारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला रुपये ५५.०० कोटी (रुपये पंचावन्न कोटी फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. या बाबतचा होणारा खर्च "मागणी क्रमांक ए-९, ५०५३ नागरी विमानचालनाकरिता भांडवली खर्च, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०१) केंद्र शासनाकडून विशेष सहाय्य

योजनेअंतर्गत बिनव्याजी कर्ज, (०१) (०१) प्रधानमंत्री गती शक्ती-महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीअंतर्गत विमानतळ प्रकल्प (योजना भाग-२) (कार्यक्रम), ५३-मोठी बांधकामे (५०५३ ००९७) " या लेखाशीर्षातील ५३-मोठी बांधकामे या उद्दिष्टाखाली संबंधित आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो विहीत मुदतीत खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत खर्चाचा आढावा वेळोवेळी शासनास सादर करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.अनौस ३३/१४४३, दि.२५.०१.२३ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रंमाक अनौस ८१/व्यय ४,दि.१५.०२.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०३२३१५११०५३८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHILPA ABHAY CHACHAD

Digitally signed by SHILPA ABHAY CHACHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=3f0b1454eadcb46569c38e868a5b441a8a32b442036ce5c8ffbed5e862cc4202, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=15FE38A4E995535864D6D7BC4CB39F75BB8A6906B9DA526DCB4921B96EE9B6EF, cn=SHILPA ABHAY CHACHAD
Date: 2023.03.23 15:16:25 +05'30'

**( शिल्पा चाचड )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
२. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई.
३. प्रधान सचिव, (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
४. संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई.
५. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, जिल्हा अहमदनगर.
७. महालेखापाल, ( लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.२५), मंत्रालय, मुंबई
९. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. निवड नस्ती.